महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग, पुणे यांना निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.
प्रथम हप्ता

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्र. आयोग-२०२१/प्र.क्र.१८१/मावक**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०९ डिसेंबर, २०२१

वाचा -

(१) शासन अधिसूचना क्र.आयोग-२०२१/प्र.क्र.१३६/मावक, दि. २९ जून, २०२१.

(२) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग यांचे पत्र क्र. मरामाआ/लेखा/प्र.क्र.१०३/ २०२०-२१/३४६, दि. २८ जुलै, २०२१.

(३) वित्त विभाग ज्ञापन क्र. आकनि-२०२१/प्र.क्र.०३/अर्थ-५, दि. ९ डिसेंबर, २०२१

**प्रस्तावना :-**

मा. सर्वोच्च न्यायालयाने रिट याचिका (सिव्हील) क्र. ९८०/२०१९ मध्ये दि. ०४.०३.२०२१ रोजी दिलेल्या निर्णयातील परिच्छेद क्र. १२ विचारात घेवून शासन अधिसूचना दि.२९.०६.२०२१ अन्वये महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोगास स्थानिक स्वराज्य संस्थामधील आरक्षणाशी संबंधित विनिर्दिष्ट कामे पार पाडण्यासाठी समर्पित आयोग (Dedicated Commission) म्हणून घोषीत करण्यात आले असून आयोगाची कार्यकक्षा (Terms of reference) निश्चित करण्यात आलेली आहे. आयोगाने त्यांच्यावर सोपविण्यात आलेली विनिर्दिष्ट कामे पार पाडण्यासाठी संभाव्य अंदाजपत्रक तयार करुन रु. ५ कोटी रक्कमेची मागणी मनुष्यबळ व कार्यालयीन खर्चाकरीता दि. २८.०७.२०२१ रोजीच्या पत्रान्वये शासनास केली. सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोगास रु. १.५७ कोटी इतकी तरतुद नियमित कामकाजाकरीता मंजूर करण्यात आली असून त्यापैकी रु. १.२२ कोटी इतकी रक्कम वितरित करण्यात आलेली आहे. तथापि, आयोगावर सोपविण्यात आलेल्या विशिष्ट कामकाजास अनुसरुन आयोगाने सादर केलेल्या अंदाजपत्रकीय खर्चाबाबत उचित आदेश पारित होईतोपर्यंत आयोगास तातडीची बाब म्हणून सदर कामासाठी वित्त विभागाने संदर्भाधीन दि. ०९.१२.२०२१ च्या ज्ञापनान्वये आकस्मिकता निधीतून रु. ५ कोटी इतका निधी मंजूर केलेला आहे. सदर निधी आयोगास प्रथम हप्ता म्हणून उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोगास स्थानिक स्वराज्य संस्थामधील आरक्षणाशी संबंधित विनिर्दिष्ट कामे पार पाडण्यासाठी प्रथम हप्ता म्हणून रु. ५,००,००,०००/- (अक्षरी रुपये पाच कोटी फक्त ) इतकी रक्कम वित्त विभागाद्वारे आकस्मिकता निधीतून मंजूर करण्यात आलेली आहे. सदर निधी महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोगास खालील प्रमाणे वितरित करण्यात येत आहे:-

| अ. क्र. | बाब | लेखाशीर्ष व उद्दिष्ट | उपलब्ध करुन देण्याबाबतचा निधी (रुपये) |
|---|---|---|---|
| १ | किमान १५ अधिकारी/कर्मचारी यांचे कक्ष स्थापन करण्यासाठी | २२२५ एफ ३५२ (१०) (कंत्राटी सेवा) | ५०,००,०००/- |
| २ | कार्यालयीन खर्चाकरीता | २२२५ एफ ३५२ (१३) (कार्यालयीन खर्च) | ४,५०,००,०००/- |
| **एकूण** | | | **५,००,००,०००/-** |

२. सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग यांनी आकस्मिकता निधीतून खर्च करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकाऱ्याकडे रक्कम सुपूर्द करण्यासंबधीच्या आदेशात/पत्रात आगाऊ रकमेतून खर्च करतांना कोषागारात सादर करण्यात येणाऱ्या देयकावर **"आकस्मिकता निधी अग्रीम वित्त विभाग, ज्ञापन क्र: आकनि-२०२१/प्र.क्र.३/अर्थ-५, दि. ०९/१२/२०२१ अन्वये मंजूर"** असे लाल शाईने लिहावे, अशा स्पष्ट सुचना नमूद करण्यात याव्यात. ही सुचना लाल शाईने अधोरेखित करावी.

३. सदर खर्च खालील लेखाशिर्षांर्गात भागविण्यात यावा.

मागणी क्र: -झेड जी-०३
लेखाशिर्ष :- २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण,
०३, मागावर्गीयाचे कल्याण
००१, संचालन व प्रशासन
(०१)विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्ग यांचे कल्याण
(०१) (०२) राज्य मागासवर्ग आयोग
(अनिवार्य) (२२२५ एफ ३५२)
१०- कंत्राटी सेवा
१३- कार्यालयीन खर्च
आकस्मिकता निधी संकेतांक (८०००७७३४)

४. सदर तरतूद खर्च करण्यासाठी सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग यांना नियत्रंण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी आहरण करुन हा खर्च वेळेत होईल याबाबत सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग यांनी पहावे तसेच याबाबतचा अहवाल व खर्चाची माहिती शासनास पाठवावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. ११०९/२०२१/व्यय-१४, दि. ०९.१२.२०२१ आणि वित्त विभाग ज्ञापन क्र: आकनि-२०२१/प्र.क्र.३/अर्थ-५, दि. ०९.१२.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०२११२१०१६५६४१५५२२ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by SANJAY D MANE
Date: 2021.12.10 16:58:09 +05'30'

**( सं. द. माने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल महोदयांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव मंत्रालय, मुंबई.
३) मा. उप मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव मंत्रालय, मुंबई.

४) अपर मुख्य सचिव (वित्त),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
७) संचालक लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई.
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९) निवासी लेखापरिक्षक अधिकारी, मुंबई.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
११) कार्यासन (व्यय-१४, अर्थ-५) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवडनस्ती (मावक)